राज्यातील कारागृहातील बंदयांना मेहनाताना निश्चित करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
शासन निर्णय क्रमांकः जेएलई-१०१३/७२६/प्र.क्र.१८५/तुरुंग-१
मंत्रालय,३० वा मजला, जागतिक व्यापार केंद्र,
कफ परेड,मुंबई-४०००05
तारीख: २० ऑगस्ट,२०१४

वाचा:-

१) शासन निर्णय क्रमांकः गृह विभाग क्र.जेएलडी-३२९८/९८/२००/पीआरएस-१,दि.२५.११.१९९९

२) शासन निर्णय क्रमांकः गृह विभाग क्र.जेएलई-१०१०/३७०५/प्र.क्र.१७९/तुरुंग-१, दि.०६.०९.२०१०

३) शासन निर्णय क्रमांकः गृह विभाग क्र.जेएलई-१०१३/७२६/प्र.क्र.१८५/तुरुंग-१,दि.१०.०७.२०१३

## शासन निर्णय:-

राज्यातील कारागृहातील बंदयांचे किमान वेतन संदर्भाधीन क्र.२ मधील शासन निर्णयान्वये निश्चित करण्यात आले आहे. गुजरात, तिहार (नवी दिल्ली) व कर्नाटक राज्यात बंदयांना प्रतिदिन देण्यात येणा-या वेतनाचा विचार करता राज्यात बंदयांना देण्यात येणारे वेतन सध्याचा महागाईचा विचार करता सुधारणे आवश्यक असल्याचे कारागृह महानिरीक्षणालयाने प्रतिपादित केल्यावर दिनांक १०.०७.२०१३ च्या शासन निर्णयान्वये कारागृह महानिरीक्षक यांच्या अध्यक्षतेखाली समिती स्थापन करण्यात आली होती. सदर समितीने सादर केलेल्या शिफारशीनुसार खालीलप्रमाणे बंदयांना मेहनताना देण्यास शासन मंजूरी देत आहे.

| अ.क्र. | बंदयाची वर्गवारी | सध्याचा वेतन प्रति दिवस/प्रति टास्क | बंद व खुले कारागृहातील बंदयांसाठी सुधारीत मेहनताना प्रति दिवस/ प्रति टास्क | खुल्या वसाहतीतील बंदयांसाठी सुधारीत मेहनताना (प्रति दिवस/ प्रति टास्क |
|---|---|---|---|---|
| १ | कुशल | रु.४०.०० | रु.५५.०० | रु.७०.०० |
| २ | अर्धकुशल | रु.३५.०० | रु.५०.०० | --- |
| ३ | अकुशल | रु.२५.०० | रु.४०.०० | --- |

सदर वाढ महाराष्ट्र विधानमंडळाच्या नजरेस आणून देण्यात यावी.

उपरोक्त तक्त्यात नमूद केल्याप्रमाणे बंदयांच्या सुधारीत मेहनतान्यामध्ये दर तीन वर्षांनी १०% (दहा टक्के) वाढ करण्यात यावी.

बंदयांना देण्यात येणारा सुधारित मेहनताना सदर शासन निर्णय निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून लागू होईल.

बंदयांच्या मेहनातान्यामध्ये वाढ करण्याबाबतचा होणार खर्च १) मागणी क्र.बी-७,२०५६ तुरुंग १०१ (एक) मध्यवर्ती तुरुंग-०२ मजूरी (२०५६००३५) व २) मागणी क्र.बी-७ २०५६ तुरुंग - १०१ (दोन) जिल्हा तुरुंग -०२ मजूरी (२०५६ ००४४) या शिर्षाखाली त्या वित्तीय वर्षातील मंजूर केलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांच्या अनौपचारीक संदर्भ क्र.१४/१४/व्यय-८, १६.०१.२०१४ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८१९१६१६०९७६२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Tikamdas Nathuji Shikharame

Digitally signed by Tikamdas Nathuji Shikharame
DN: CN = Tikamdas Nathuji Shikharame, C = IN, S = Maharashtra, O = Home Department, OU = Home
Date: 2014.08.20 15:11:23 +05'30'

( टि.न.शिखरामे )
कक्ष अधिकारी,गृह विभाग,महाराष्ट्र शासन.

प्रत,

१) अपर पोलीस महासंचालक व कारागृह महानिरीक्षक,महाराष्ट्र राज्य,पुणे
२) विशेष पोलीस महानिरीक्षक (कारागृह), दक्षिण विभाग,मुंबई
३) कारागृह उपमहानिरीक्षक, (मुख्यालय), कारागृह महानिरीक्षणालय,पुणे/ पश्चिम विभाग, पुणे/ मध्य विभाग, औरंगाबाद/पूर्व विभाग, नागपूर
४) सर्व अधीक्षक मध्यवर्ती कारागृह
५) सर्व अधीक्षक जिल्हा कारागृह
६) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१,मुंबई
७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-२,नागपूर
८) महालेखापाल (लेखा परिक्षा) महाराष्ट्र-१,मुंबई
९) महालेखापाल (लेखा परिक्षा) महाराष्ट्र-२,नागपूर
१०) अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई
११) निवासी लेखा अधिकारी, मुंबई
१२) जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)

१३) वित्त विभाग (व्यय-८/अर्थसंकल्प-३/१०)
१४) गृह विभाग बीयुडी-१,तुरुंग-२,तुरुंग-३
१५) निवडनस्ती तुरुंग-१